(२६९) 20150623152147332 7

तळवणे खारभूमी योजना ता.सावंतवाडी, जि. सिंधुदुर्ग या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(३०४/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १०/०१/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/तळवणे/तां-२(१) ४७७८, दि.८/७/२०१०

प्रस्तावना :-

तळवणे ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग खारभूमी योजना सन १९८४ मध्ये बांधण्यात आलेली असून सुमारे २६ वर्षे जूनी आहे. ही योजना खारभूमी बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेमध्ये ६३० मी. लांबीचा बांध व एका उघाडीचा समावेश आहे. सदर उघाडी पूर्णपणे मोडकळीस आली असून सतत उधाणाने बांधाचे सुध्दा नुकसान झाले आहे. सदर योजना समुद्रापासून अत्यंत जवळ असल्याने सततचे उधाण व पूर इ. कारणांमुळे मूळ बांधाचे व उघाडीचे नुकसान झाले आहे. बांध सखल व कमकुवत झाला असून त्यामुळे खारे पाणी लाभक्षेत्रात पसरुन भात शेती व माड बागायतीचे नुकसान होत आहे. त्यामुळे सदर योजनेचा नुतनीकरणाच्या कामाचा प्रशासकीय मान्यता प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये तळवणे खारभूमी योजना ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रु.३६,३९,५१७/- (रुपये छत्तीस लक्ष, एकोणचाळीस हजार, पाचशे सतरा फक्त) यापैकी रु.३३,०८,६५२/- कामाप्रित्यर्थ व रु.३,३०,८६५/- अनुषंगिक खर्च इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना (१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण १०९९/१२९/९९/मो प्र (म) विनियम दि.१८.५.१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (०९/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(३०४/२०१०) खारभूमी दिनांक १०/०१/२०११ चे सहपत्र
तळवणे खारभूमी योजना ता. सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रूपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ७१४७ |
| २ | 'बी' भूसंपादन | --- |
| ३ | 'सी' मुख्य कामे | २७४३९२६ |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | ५२९३९६ |
| ५ | 'के' इमारती | -- |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | -- |
| ७ | 'ओ' संकीर्ण | २०००० |
| ८ | 'पी' देखभाल | ८१८३ |
| ९ | 'आर' दळणवळण | -- |
| | एकूण | ३३०८६५२ |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ३३०८६५ |
| | एकूण | ३६३९५१७ |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | ३९ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ९३३२१/- |
| लाभव्यय गुणोत्तर | ४.१० |
| दरसूची वर्ष | २००८-०९<br>सा.बां.वि. २००९-२०१० |

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc